**सार्सिबोथ-२ (संग्राहक) लघु पाटबंधारे योजना,ता. मंगरूळपीर, जि. वाशिम, या योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः लपायो २२१२/७१/१२/लपा-२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: १७.०७.२०१४

पहावे

**१) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र क्र. ३५७/विपाविम /कांता-७/(३२९/२०११) दिनांक १३.०१.२०१२.**

प्रस्तावना

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळा अंतर्गत असलेल्या सार्सिबोथ-२ (संग्राहक) लघु पाटबंधारे योजना ता. मंगरूळपीर जि. वाशिम या योजनेस महामंडळ निर्णय क्र. विमाविम/कातां/७/७/सार्सिबोथ-२/प्रमा(४३/२००८)., दि. ०७.०१.२००९ अन्वये रू. ५०७.४०४ लक्ष रकमेस मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान करणेत आली आहे. यापैकी रू. ४६५.५४६ लक्ष कामाप्रीत्यर्थ आणि रू. ४१.८५८ लक्ष अनुषंगिक खर्च आहे. हा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करताना सन २००८-०९ च्या दरसूचीप्रमाणे अनुज्ञेय दर वापरण्यात आले होते. या योजनेच्या कामास नोव्हेंबर २००९ ला सुरूवात करण्यात आली. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या किमतीत दरसूचीतील वाढ, भूसंपादन खर्चातील वाढ, जास्त दराची निविदा स्विकृती, संकल्पनातील बदल व इतर कारणांमुळे प्रशासकीय मान्यता प्राप्त किंमतीच्या दहा टक्क्यांहून अधिक वाढ होत असल्यामुळे योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे बाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयान्वये सार्सिबोथ-२ (संग्राहक) लघु पाटबंधारे योजना ता. मंगरूळपीर जि. वाशिम या योजनेच्या रू. ९०२.८७२ लक्ष (रू. नऊ कोटी, दोन लक्ष, सत्याऐंशी हजार, दोनशे मात्र) किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता योजनेची उर्वरित कामे सुधारित प्रशासकीय मान्येच्या किंमतीत पूर्ण करण्याच्या अटीच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेत येत आहे.

सदर रकमेपैकी रूपये ८४७.११३ लक्ष (रू. आठ कोटी, सत्तेचाळीस लक्ष, अकरा हजार, तीनशे, मात्र) कामाप्रीत्यर्थ व रूपये ५५.७५९ लक्ष (रू. पंचावन्न लक्ष, पंचाहत्तर हजार, नऊशे, मात्र) अनुषंगीक

खर्च आहे. अंदाजपत्रकात कामासाठी सन २००९-१० या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशिर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय ५, "४७०२ पंचवार्षिक योजनांतर्गत योजना ८० सर्वसाधारण (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (००)(०५) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (योजनांतर्गत, संगणक सांकेतांक क्र. ४७०२ ५१०१) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र ९६/१४३४, दि. १४.०३.२०१३ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३५०/व्यय-१२, दि. २९.११.२०१३ नुसार दिलेल्या सहमतीनुसार तसेच वित्त विभागाच्या पत्र क्र. व्यअस/५१/अर्थसं.२ दि. २८.०३.२०१४ अन्वये व्यय अग्रक्रम समितीने दिलेल्या मान्यतेने निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकीय मान्यता (६९/२०१४) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२२१४०५३०५६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2014.07.22 14:04:23 +05'30'

**(रा. बा. क्षीरसागर)**
शासनाचे अवर सचिव

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
३. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२.
४. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
५. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
६. मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प, जलसंपदा विभाग, अमरावती.
(सोबत सुधारित प्रशासकीय मान्यतेची परिनिरिक्षण टिप्पणी जोडली आहे.)

७. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. जिल्हाधिकारी, वाशिम.
९. अधीक्षक अभियंता, वाशिम पाटबंधारे मंडळ, वाशिम.
१०.कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे विभाग, वाशिम.
११.अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.लपा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. (२ प्रती).
१४.लपा-२, संग्रहार्थ.

## शासन निर्णय क्रमांक : लपायो २२१२/(७१/१२) दि. १७.०७.२०१४ चे परिशिष्ट
## सार्सिबोथ-२, (संग्राहक) लघुपाटबंधारे योजना ता. मंगरूळपीर, जि. वाशिम
## उपशिर्षनिहाय तरतूदींचा गोषवारा

| क्र. | उपशिर्ष | प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यतेनुसार रक्कम (रूपये लाखात) |
|---|---|---|
| १ | 'ए' प्राथमिक | २.१४७ |
| २ | 'बी' भूमीसंपादन | ३१०.२५८ |
| ३ | 'सी' कामे | ५०६.४२३ |
| ४ | 'डी' विमोचक | १४.६२३ |
| ५ | 'के' इमारत | ३.९१२ |
| ६ | 'एम' वृक्षारोपन | १.५० |
| ७ | 'ओ' संकीर्ण | २.५० |
| ८ | 'पी' देखभाल | २.५० |
| ९ | 'आर' दळणवळण | २.२५ |
| १० | 'एक्स' पर्यावरण | १.०० |
| | **एकूण** | **८४७.११३** |
| | **अनुषंगिक खर्च** | **५५.७५९** |
| | **एकूण रक्कम** | **९०२.८७२** |

**ठळक बाबी**

अ) या योजनेची सिंचन क्षमता २९५ हेक्टर आहे.

ब) या योजनेुळे होणारा पाणीसाठा १.७५१ दलघमी. आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रू. ५१,५६३/- (मापदंड रू. ३८,३१६/-)

ड) आर्थिक परतावा दर २०.२०%

इ) लाभव्यय गुणोत्तर - १.६०